परिविक्षाधीन सहाय्यक जिल्हाधिकारी (भा. प्र. से.) यांच्याकरीता अहमदनगर जिल्ह्यात १ अधिसंख्य सहायक जिल्हाधिकारी पद निर्माण करणेबाबत....

**महाराष्ट्र शासन**

महसूल व वन विभाग

शासन निर्णय, क्रमांकः पदनि-२०१८/प्र. क्र.५०/ई-८

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक - ०७ जुलै, २०१८.

**संदर्भ:-**

१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दि.२० फेब्रुवारी, २०१६.

२) सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र. टीआरएन-१०१८/प्र. क्र.१४९/२०१८/दहा, दि. १७/०३/२०१८.

३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्रमांकः पदनि-२०१८/प्र. क्र.५०/ई-८ दि. ०९.०४.२०१८

४) सामान्य प्रशासन विभागाचे पत्र क्र. टीआरएन-१०१८/प्र. क्र.१४९/२०१८/दहा, दि. ०२/०७/२०१८.

**शासन निर्णय:-**

सन २०१७ च्या तुकडीतील परिविक्षाधीन भारतीय प्रशासन सेवेमधील ६ अधिका-यांचे लाल बहादुर शास्त्री राष्ट्रीय प्रशासन अकादमी, मसुरी येथील फेझ-१ चे प्रशिक्षण दि. ११.०५.२०१८ (म. नं.) रोजी संपुष्टात आल्यानंतर हे अधिकारी त्यांच्या पुढील जिल्हा प्रशिक्षणाकरिता राज्य शासनाकडे रुजू झाले आहेत. सदरहू ६ परिविक्षाधीन भारतीय प्रशासन सेवा अधिका-यांच्या जिल्हा प्रशिक्षणासाठी त्यांची परिविक्षाधीन सहाय्यक जिल्हाधिकारी म्हणून त्यांच्या नावासमोर नमूद केलेल्या जिल्ह्यात संदर्भीय क्र. ३ येथील दि. ०९.०४.२०१८ च्या शासन निर्णयान्वये पदस्थापना करण्याच्या दृष्टीने सदर ६ जिल्हयात प्रत्येकी १ असे अधिसंख्य सहाय्यक जिल्हाधिकारी हे पद निर्माण करण्यात आले आहे.

२. सिंधुदुर्ग येथे नियुक्ती देण्यात आलेले भारतीय प्रशासन सेवा अधिकारी श्री. प्राजित प्रभाकरन नायर, अधिसंख्य सहाय्यक जिल्हाधिकारी यांची सिंधुदूर्ग या जिल्हयाऐवजी अहमदनगर या जिल्हयासाठी दि. २८.०८.२०१७ ते २७.०८.२०१९ या कालावधीसाठी नियुक्ती करण्याचा निर्णय शासनाने घेतलेला आहे. असे सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भीय क्र. ४ येथील पत्रान्वये कळविण्यात आले आहे. त्यास अनुसरून संदर्भीय क्रमांक ३ येथील शासन निर्णयात अंशत: सुधारणा करून सिंधुदूर्ग जिल्हयाऐवजी अहमदनगर जिल्हयात जिल्हाधिकारी कार्यालयाच्या आस्थापनेवर सहाय्यक जिल्हाधिकारी संवर्गात रु. १५६००-३९१०० (ग्रेड पे रू. ५४००) च्या वेतन श्रेणीत

दि.२८.०८.२०१७ ते दि.२७.०८.२०१९ या दोन वर्षाच्या कालावधीसाठी अधिसंख्य सहाय्यक जिल्हाधिकाऱ्याचे एक पद निर्माण करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. शासनाने वेळोवेळी काढलेल्या आदेशानुसार उपरोक्त अधिसंख्य सहायक जिल्हाधिकारी यांना महागाई भत्ता व इतर भत्ते अनुज्ञेय राहतील.

४. सदर अधिसंख्य सहाय्यक जिल्हाधिकारी यांच्या पदावर होणारा खर्च " मागणी क्र. सी-१-२०५३ -जिल्हा प्रशासन (००) ०९३ जिल्हा आस्थापना, (०१) सर्वसाधारण आस्थापना (०१)(०२) आयुक्त नाशिक (२०५३ ००४६), बाब क्र.०१ वेतन" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात येवून मंजूर अर्थसंकल्पिय अनुदानातून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दि.२० फेब्रुवारी, २०१६ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१८०७०७१२५८३७१२१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Nilkanth Pandurang Awhad

Digitally signed by Nilkanth Pandurang Awhad
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e42a88b7548c3a7d48b7a77d85de3524cf8f2e7e0f87091223ad803d4d4a2a31, cn=Nilkanth Pandurang Awhad
Date: 2018.07.07 13:12:10 +05'30'

(नि. पां. आव्हाड)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) विभागीय आयुक्त, कोकण/नाशिक.
२) जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग/अहमदनगर.
३) जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदुर्ग/ अहमदनगर.
४) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा) महाराष्ट्र -१, मुंबई.
५) उप सचिव, कार्यासन १०, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६) उप सचिव, वित्तीय सुधारणा-१, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
७) उप सचिव/ सह सचिव (कार्यासन ब-१ / ई-१) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८) निवड नस्ती, कार्यासन ई-८.